**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा गट ब (तां.) या संवर्गातील सहाय्यक प्रशिक्षणार्थी सल्लागार या पदांवर सरळसेवेने नियुक्त केलेल्या उमेदवाराच्या पदस्थापनेत बदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन आदेश क्रमांक: व्यशिअ-२०१५/(४३८/१५)/व्यशि-१**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ जुलै, २०१७.

**संदर्भ** :-
१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे गोपनीय पत्र क्र.१५(२)(१८३)/७१०/सात-अ, दि.१६ डिसेंबर, २०१५.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे गोपनीय पत्र क्र.१५(२)(१८३)/७१०/सात-अ, दि.१४ जुलै, २०१६
३) शासनाचे दि.१८ ऑगस्ट २०१६ चे समक्रमांकित पत्र.
४) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे गोपनीय पत्र क्र.१५(२)(१८३)/७१०/सात-अ, दि.९ सप्टेंबर, २०१६.
५) संचालक (सेवा व लेखा), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म. रा., मुंबई यांचे पत्र क्र.१०/आस्था-१/२०१६/२२०, दि.२.१२.२०१६.
६) शासनाचे समक्रमांकित दिनांक ८ मार्च, २०१७ रोजीचे शासन आदेश.
७) शासनाचे पत्र क्रमांक व्यशिअ-२०१५/(प्र.क्र.४३८/१५)/व्यशि-१, दि.२८.६.२०१७.

**आदेश**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा गट ब (तांत्रिक) या संवर्गातील सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, या पदांवर वेतनश्रेणी रु.९३००-३४८००/- ग्रेड पे रु. ४८००/- मध्ये खाली नमूद केलेल्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयामध्ये, ते ज्या दिनांकापासून पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी वरील संदर्भ क्रमांक ६ येथील दिनांक ८ मार्च, २०१७ च्या आदेशान्वये विविध अटीस अधिन राहून नामनिर्देशनाद्वारे तात्पुरती नियुक्ती करण्यात आली आहे. सदर आदेशातील अनुक्रमांक ०४ वरील श्री. संजय देविदास पाटील यांची नियुक्ती सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, मुलभूत प्रशिक्षण तथा अनुषंगिक सूचना केंद्र द्वारा औद्योगिक प्रशिक्षण संस्था, धुळे जि. धुळे या पदावर सरळ सेवेने नियुक्ती करण्यात आली होती. तथापि, श्री.पाटील यांनी त्यांच्या दिनांक १३.०३.२०१७ च्या निवेदनान्वये ते सदर पदावर रुजू होण्यास इच्छूक नसल्याबाबत शासनास कळविले आहे. तद्नुषंगाने सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री.पाटील यांची नियुक्ती संदर्भाधीन क्रमांक ७. येथील दि.२८.६.२०१७ च्या शासन पत्रान्वये रद्द करण्यात आली आहे.

तसेच सदरहू दि.८ मार्च, २०१७ च्या शासन आदेशातील अ.क्र. २० वरील उमेदवार श्री. शाह मोहम्मद अजिम मोहम्मद सफी यांच्या पदस्थापनेत पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | मूळ प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | दिनांक ८ मार्च, २०१७ च्या शासन आदेशातील पदस्थापनेत पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे. |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| २० | श्री. शाह मोहम्मद अजीम मोहम्मद सफी | D.T. (A) | D.T.(A) | **(नाशिक विभाग)** सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार (तां.), मुलभूत प्रशिक्षण तथा अनुषंगिक सूचना केंद्र द्वारा-औद्योगिक प्रशिक्षण संस्था, धुळे, जि.धुळे. (रिक्त जागी) |

२. संदर्भांकित क्रमांक ६ येथील दि. ८ मार्च, २०१७ रोजीच्या शासन आदेशातील अटी कायम राहतील.

३. सदर आदेश सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र.: २०१७०७०११७४७२३०५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SD And E Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6d1f4d2e41b8e84bb98ddddcac3054927f82f9c1a5810e2874cdac2c44c28c2, cn=Sakharam Dina Kharat
Date: 2017.07.01 17:44:26 +05'30'

(स.दि.खरात)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई-१.
२) मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव.
३) मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ५१/२, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई-४०० ०२१. (पत्राद्वारे)
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.

६) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. (संचालकांमार्फत)
८) सर्व संबंधित उपकोषागार अधिकारी. (संचालकांमार्फत)
९) सर्व संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा (संचालकांमार्फत)
१०) श्री.संजय देविदास पाटील, भूजल कॉलनी, किसान पाईप फॅक्टरी जवळ, मुंबई आग्रा हायवे, देवपूर, धुळे - ४२४००२.
११) श्री.शाह मोहम्मद अजीम मोहम्मद सफी, १७७, ८० फुटी रोड, अन्सार नगर, धुळे-४२४००१.
१२) निवडनस्ती (व्यशि-१).